**डोंगर उतारावरील/धोकादायक दरडीखाली राहणाऱ्या झोपडपट्टीवासियांच्या संरक्षणार्थ संरक्षक भिंती बांधण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१०/प्र.क्र.१६२(अ)/झोपनि-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०४ मार्च, २०१५.

**प्रस्तावना -**

बृहन्मुंबईमध्ये विविध डोंगर उतारावर व उंच टेकडयांवर झोपडपट्टया वसलेल्या आहेत. सदर डोंगरांची होणारी झीज व दरडी कोसळणे व परिणामी सदर डोंगर उतारावरील धोकादायक स्थितीमध्ये असणाऱ्या झोपडपट्टीवासियांबाबत मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळासमवेत चर्चा करुन कार्यकृती आराखडा सादर करण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण यांना कळविण्यात आले होते. त्यानुसार सादर झालेल्या दि.१७.०४.२०१० रोजीच्या अहवालात धोकादायक स्थितीत असलेल्या झोपडपट्टयांच्या तपशिलात मुंबई शहर व उपनगर जिल्ह्यामध्ये एकूण धोकादायक ठिकाणे ३२७, अंदाजे झोपड्यांची संख्या २२४८३, संरक्षण भिंतीद्वारे संरक्षित होणाऱ्या झोपड्यांची संख्या १०३८१ व स्थलांतरीत झोपड्यांची संख्या ९६५७ इतकी असल्याचे दिसते.

**शासन निर्णय-**

मुंबईत मोठया प्रमाणात पाऊस व काही भागात सतत अतिवृष्टी होऊन दरडी कोसळण्याची गंभीर परिस्थिती निर्माण होते. तथापि, बृहन्मुंबईत झोपडयांची संख्या तसेच घनता जास्त आहे. तसेच दरवर्षी मोठया प्रमाणावर निधीची आवश्यकता भासते. सदरहू बाबीकरीता जिल्हा नियोजन समितीकडून उपलब्ध होणाऱ्या निधीतून म्हाडाचा घटक असलेल्या मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळाकडून आतापर्यंत ९ मिटर उंचीच्या संरक्षक भिंती बांधण्याचे काम होत आहे. तथापि, आय.आय.टी.ने अलिकडे ९ मिटरपेक्षा जास्त उंचीवर असलेल्या डोंगर उताराचे संरक्षण होण्याच्या दृष्टीने एच.ई.ए.पॅनेल, मॅक मॅट अँकरिंग, रॉक फॉल प्रोटेक्शन, बॅरियर्स सिस्टीम व ड्रोपरी सिस्टीम इत्यादी ज्या विशेष उपाययोजना सुचविल्या आहेत, त्या तज्ञ व संबंधित अनुभवी अभियंत्यामार्फत करणे उचित असलेली विशेष स्वरुपाची कामे झोपडपट्टी सुधार मंडळाकडून करणे योग्य नाही. नियोजन विभागाच्या अभिप्रायानुसार सर्वसाधारण जिल्हा वार्षीक योजनांमध्ये राबविण्यात येणारी झोपडपट्टीवासियांचे स्थलांतर व पुनर्वसन अशी जिल्हास्तरीय योजना समाविष्ट असल्याचे नियोजन विभागाने निदर्शनास आणून त्याबाबत धोरणात्मक/मार्गदर्शक सुचना नसल्याने जिल्हा वार्षीक योजनेच्या आराखडयातून खर्च करता येत

नसल्याच्या कारणास्तव झोपडपट्टीवासियांचे स्थलांतर व पुनर्वसन या जिल्हास्तरीय योजनेचा शासन निर्णय निर्गमित करण्याबाबत सूचित करण्यात आले आहे. यास्तव सदरहू शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. झोपडपट्टयांच्या जागी ९ मिटर उंची पर्यंतच्या संरक्षक भिंती बांधण्यासाठी कार्यन्वयन यंत्रणा म्हणून विभागाच्या अधिपत्याखालील म्हाडा प्राधिकरणाचा घटक असलेल्या मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळास निधी उपलब्ध करण्यात येत असल्याने व झोपडपट्टी सुधार मंडळ हे ९ मिटर उंचीपर्यंतचे काम करीत असल्याने त्याप्रमाणे यापुढे देखील सदरहू संरक्षक भिंत बांधण्याचे काम झोपडपट्टी सुधार मंडळाकडून करणे रास्त होईल. सदरहू ९ मीटर उंची पर्यंतच्या संरक्षण भिंती बांधताना खालील मार्गदर्शक सुचना व तत्वांचा अवलंब होणे आवश्यक आहे.

१) सहाय्यक आयुक्त, मुंबई महानगरपालिका यांचेकडून अथवा Disaster Management Committee महानगरपालिका यांचेकडून संभाव्य दरडी कोसळणाऱ्या जागांची यादी प्राप्त झाल्यावर सदर यादी मा.जिल्हाधिकारी यांचे कार्यालयास पाठवावी व संरक्षक भिंत बांधण्यासाठी निधी उपलब्ध झाल्यावर अशा झोपडपट्टयातील रहिवाश्यांचे संरक्षण करण्यासाठी संरक्षक भिंतीचे काम हाती घ्यावे.

२) सुचविण्यात आलेल्या ठिकाणांची तांत्रिक अधिकाऱ्यांनी पाहणी करुन ९ मिटर उंचीपर्यंतची संरक्षण भिंत बांधणे शक्य व योग्य आहे किंवा कसे तसेच सदर ठिकाणांची निकड लक्षात घेऊन आणि जिल्हाधिकारी कार्यालयाकडून प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यावरच आवश्यक ठिकाणी कामे हाती घ्यावीत.

३) ९ मीटर उंचीपर्यंतची उपरोक्त संरक्षक भिंतीची कामे डोंगर उतारावरील झोपडपट्टयांमध्ये संभाव्य जिवित व वित्तहानी टाळण्याच्या दृष्टीने व घोषित/अघोषित वा अधिकृत/अनधिकृत झोपडपट्टी असा फरक विचारात न घेता करण्यात यावीत.

४) डोंगर उतारावर ९ मीटर उंची पर्यंतच्या दगडी संरक्षक भिंतीचे बांधकाम आय.आय.टी.पवई ने दिलेल्या संकल्पनेनुसार व आराखड्यानुसार किंवा ज्येष्ठ अभियंत्यांच्या मतानुसार सलोह सिमेंट क्राँक्रीटच्या (RCC) भिंतीचे बांधकाम करण्यात यावे.

५) उपरोक्त संरक्षक भिंतीची कामे फक्त डोंगर उतारावरील झोपडपट्टयांमध्येच आणि जेथे झोपडपटटी पुनर्वसन योजना मंजूर झालेली नाही, अशा झोपडपटयांमध्येच करण्यात यावीत.

६) सदर निधीतून नाला, गटारे व Road Embankment च्या आधार भिंतीची कामे करण्यात येऊ नयेत.

७) संरक्षक भिंतीचे काम झोपडपट्टी बाहेरील उच्चभ्रू खाजगी वसाहतीमधील रहिवाश्यांचे संरक्षण करण्यासाठी हाती घेवू नये.

आय.आय.टी.पवई यांनी सुचविलेल्या ९ मिटरपेक्षा जास्त उंचीवर असलेल्या डोंगर उताराचे संरक्षण होण्याच्या दृष्टीने एच.ई.ए.पॅनेल, मॅक मॅट अँकरिंग, रॉक फॉल प्रोटेक्शन, बॅरियर्स सिस्टीम व ड्रोपरी सिस्टीम इत्यादी विशेष उपाययोजनेची कामे झोपडपट्टी सुधार मंडळामार्फत करण्यात येऊ नयेत अशी कामे सार्वजनिक बांधकाम विभाग अथवा अन्य सुयोग्य यंत्रणेकडून करुन घेण्यात यावीत.

३. सदरहू शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.सं.क्र. ७६/१४७५, दि.२३.०२.२०१५ अन्वये त्या विभागाच्या अनौपचारीक परामर्शाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०५१६२०२२६१०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajaram G Salvi

Digitally signed by Rajaram G Salvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Rajaram G Salvi
Date: 2015.03.07 12:24:53 +05'30'

**( रा.ग.साळवी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री,(गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२
२) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई : ३२
३) प्रधान सचिव (गृहनिर्माण ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई : ३२
४) प्रधान सचिव (नियोजन विभाग), यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई : ३२
५) प्रधान सचिव (वित्त विभाग), यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई : ३२
६) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

७) जिल्हाधिकारी, मुंबई शहर, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई : १

८) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई.

९) महालेखापाल ( लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०.

१०) महालेखापाल ( लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर.

११) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

१२) निवासी लेखा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

१३) मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ,गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई.

१४) वित्त विभाग, अर्थोपाय/व्यय-३/अर्थ-१७ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.

१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१६) अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

१७) सह सचिव/उप सचिव (गृहनिर्माण विभाग),मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

१८) निवड नस्ती, कार्यासन झोपनि-२.